चंद्रपूर जिल्हयातील सावली येथे वन विश्रामगृहाच्या बांधकामासाठी निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. वनबां-२०१६/प्र.क्र. १६८/फ-९**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- २४ मार्च, २०१७

**वाचा :-** अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे क्र. कक्ष १/पी/यो/नबाप्र/प्र.क्र. ९९ (१४-१५) (००२६)/७५४/१६-१७, दिनांक २०.७.२०१६ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

वार्षिक योजना सन २०१६-१७ राज्य योजनेअंतर्गत वनातील इमारती / प्रशासकीय इमारतीचे बांधकाम (४४०६ ००२६) या योजनेतंर्गत रू. ३४००.०० लक्ष निधी मंजूर व अर्थसंकल्पीत आहे. चंद्रपूर जिल्हयातील सावली येथे वन विश्रामगृहाच्या बांधकामासाठी कामाची तांत्रिक मंजूरी दिनांक २२.६.२०१६ अन्वये वन अभियंता, नागपूर यांनी व मुख्य वनसंरक्षक (प्रा.), चंद्रपूर यांनी दिनांक २८.६.२०१६ अन्वये रु.९९.१९ लक्षची प्रशासकीय मंजूरी दिलेली आहे.

वार्षिक योजना सन २०१६-१७ राज्य योजनेअंतर्गत चंद्रपूर जिल्हयातील सावली येथे वन विश्रामगृहाच्या बांधकामासाठी रू.९९.१९ लक्ष वितरणाची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

वार्षिक योजना सन २०१६-१७ राज्य योजनेअंतर्गत चंद्रपूर जिल्हयातील सावली येथे वन विश्रामगृहाच्या बांधकामासाठी रू.९९.१९ लक्ष इतका निधी (४४०६ ००२६) या लेखाशिर्षाअंतर्गत विहीत केलेल्या अटी व शर्तीस अधिन राहून वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

१ सदर तरतूद खर्च करतांना वित्त विभागाने वेळो वेळी घालून दिलेल्या अटी व शर्तीचे पालन करावे. वन (संवर्धन) अधिनियम १९८० अंतर्गतच्या तरतूदीचा भंग होणार नाही, याची दक्षता घ्यावी.
२ प्रत्यक्ष खर्च करण्यापूर्वी विहीत पध्दतीचे पालन करावे व आवश्यकतेनुसार आहरण करावे.
३ सदर खर्च वित्त विभागाच्या दिनांक २०.४.२०१६ च्या परिपत्रकातील व त्यासोबतच्या परिशिष्टामध्ये नमूद केलेल्या अटीची पूर्तता होईल, याची दक्षता घेण्यात यावी.
४ सदर मंजूरीस शासन निर्णय क्रमांक एमएससी-२०११/प्र.क्र. १७८/फ-५, दिनांक ३०.९.२०११ च्या परिशिष्टात नमुद केलेल्या अटी व शर्ती बंधनकारक असतील.

उपरोक्त खर्च मागणी क्रमांक सी-१०, प्रधान लेखाशिर्ष ४४०६, वनीकरण व वन्यजीवन यावरील भांडवली खर्च, राज्य योजना अंतर्गत योजना, (०१) वनीकरण, (०७०) दळणवळण व इमारती, (००) (०२) वनातील इमारती बांधकाम (४४०६ ००२६) या लेखाशिर्षाखाली सन २०१६-१७ करिता उपलब्ध होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या दिनांक १७.०४.२०१५ च्या परिपत्रकान्वये तसेच वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र/२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनिमय, भाग-२, दिनांक १७.४.२०१५ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३२४१५५९५०७०१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prakash Kashinath Mahajan

Digitally signed by Prakash Kashinath Mahajan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Prakash Kashinath Mahajan
Date: 2017.03.24 16:00:26 +05'30'

**( प्रकाश महाजन )**
सह सचिव (वने)
महसूल व वन विभाग

**प्रत :-**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३. मुख्य वनसंरक्षक (प्रा.), चंद्रपूर.
४. विभागीय वन अधिकारी, चंद्रपूर वन विभाग, चंद्रपूर.
५. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
६. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारत-३), मंत्रालय, मुंबई-३२.
७. वित्त विभाग, व्यय-१० कार्यासन, मंत्रालय, मुंबई-३२.
८. नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई-३२.
९. फ-२/ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१०.कार्यासन फ-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.(निवडनस्ती).